नाविन्यपूर्ण योजनेंतर्गत अंशत: ठाणबंद पध्दतीने संगोपन करण्यासाठी १० शेळी/मेंढी + १ बोकड/मेंढेनर गट वाटप या (सर्वसाधारण) राज्ययोजनेंतर्गत सन २०१५-१६ या वित्तीय वर्षासाठी निधी वितरीत करणे - पूरक मागणी.

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-१३१५/प्र.क्र.३५५/पदुम-३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

तारीख: २६ ऑक्टोंबर, २०१५

वाचा:-

१. आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांचे क्र. पशुधन- ३/नाविन्यपूर्ण योजना शेळी गट २०१५-१६ /३८१५/२०१५ पशुसंवर्धन- १३, दि. २६/०८/२०१५ चे पत्र.

२. वित्त विभाग क्र. पूरक- २०१५/प्र.क्र.१४०/अर्थ- ३, दि. ६/१०/२०१५ चे परिपत्रक.

**शासन निर्णय:-**

राज्यात मांस उत्पादनास चालना देण्यासाठी तसेच ग्रामीण भागात स्वयंरोजगार निर्माण करुन शेतकरी व पशुपालाकांना शेळी पालनाव्दारे वर्षभर खात्रीशीर व सातत्यपूर्वक उत्पन्नाचे साधन उपलब्ध होईल यासाठी सन २०११-१२ पासून नाविन्यपूर्ण राज्ययोजनेंतर्गत सर्वसाधारण लाभार्थीना ७५% अनुदानावर १० शेळी मेंढी + १ बोकड/ मेंढेनर गट वाटप करणे ही योजना राबविण्यात येत आहे.

या योजनेसाठी सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात रु. ३५०.००/- लाख एवढी रक्कम अर्थसंकल्पीत करण्यात आली आहे. वित्त विभागाच्या दि. १७/०४/२०१५ च्या परिपत्रकान्वये सन २०१५-१६ मध्ये एकूण अर्थसंकल्पित निधी पैकी ७०% च्या मर्यादेत रू. २४५.००/- लाख निधी या विभागाच्या दि. १३.७.२०१५ च्या शासन निर्णयान्वये बीडीएसवर वितरीत करण्यात आला आहे. या योजनेसाठी रू. १५०.००/- लाख एवढ्या पूरक मागणीचा प्रस्ताव सादर करण्यात आला होता. त्यामुळे एकूण अर्थसंकल्पित रू. ५००.००/- लाख (३५०.०० अर्थसंकल्पित निधी + १५०.०० पूरक मागणी) एवढ्या निधीपैकी वित्त विभागाच्या दि. ०६.१०.२०१५ च्या शासन परिपत्रकानुसार ७०% च्या मर्यादेत रू. १०५.००/- (अक्षरी रुपये एकशे पाच लाख फक्त) एवढा निधी खालील लेखाशिर्षाखाली वितरीत करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

लेखाशिर्ष-

मागणी क्र. डी-४

२४०३- पशुसंवर्धन

१०४- मेंढया व लोकर विकास

(०४)(१२)- अंशत: ठाणबंद पध्दतीने शेळी / मेंढी पालनाद्वारे लाभार्थ्यांना १० + १ शेळी गटाचे वाटप करणे (सर्वसाधारण)

३३- अर्थसहाय्य

सांकेतांक- (२४०३ बी ८६२)

सदरचा शासन निर्णय नियोजन विभागाच्या क्र.अनौ.सं. १५१/१४३१, दि. २४.९.२०१५ व वित्त विभागाच्या क्र. अनौ.सं. ३९४/२०१५/व्यय-२, दि.९.१०.२०१५ च्या अनौपचारिक संदर्भानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०२०१६०६४६८८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prajakta Prakash Vasaikar

Digitally signed by Prajakta Prakash Vasaikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=98e28caafa3fac768ff9dfaf96b12116f4b46bcb39f15c00b2b09de0bf89ccc5, cn=Prajakta Prakash Vasaikar
Date: 2015.10.30 16:03:18 +05'30'

**( प्रा. प्र. वसईकर )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे.

२. महालेखापाल कार्यालय, महाराष्ट्र-१/२ (लेखा परीक्षा/अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.

३. वित्त विभाग (व्यय-२)/अर्थ-१५, मंत्रालय, मुंबई- ३२.

४. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

५. सर्व जिल्हा अधिकारी.

६. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.

७. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.

८. सर्व प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन.

९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.

१०.सर्व जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त.

११.सर्व जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद.

१२.अवर सचिव / पदुम- ४, मंत्रालय, मुंबई- ३२.

१३.कक्ष अधिकारी (पदुम-१६), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१४. निवड नस्ती (पदुम-३).